


**महाराष्ट्र शासन**

सामान्य प्रशासन विभाग,

मंत्रालय (विस्तार इमारत)

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०००३२.

दूरध्वनी क्र.(०२२) २२७९३३५५ ईमेल आयडी archana.tamore@nic.in

---

क्र : बीसीसी-२०२०/प्र.क्र.७२(भाग-१) ए/१६-ब दिनांक : २८ मार्च, २०२२

प्रति,

१) अ.मु.स. (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
२) अ.मु.स.(अ.व सु), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
३) अ.मु.स., नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
४) अ.मु.स.(परिवहन), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
५) अ.मु.स.(महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
६) अ.मु.स., इतर मागास बहुंजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई
७) अ.मु.स., सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
८) प्रधान सचिव, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
९) प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई

विषय : मराठा समाजाच्या विविध मागण्या.

महोदय/ महोदया,

मराठा समाजाच्या विविध मागण्यांसंदर्भात मा. मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली दि.२४ फेब्रुवारी, २०२२ व २८ फेब्रुवारी, २०२२ रोजी बैठक संपन्न झाली. सदर बैठकीचे इतिवृत्त अनुक्रमे दि.१० मार्च, २०२२ व १५ मार्च, २०२२ च्या पत्रान्वये निर्गमित करण्यात आलेले आहे. संबंधित विभागांनी सदर इतिवृत्तानुसार उचित कार्यवाही करुन त्याबाबतचा अनुपालन अहवाल या कार्यासनास सादर करावा.

२. दि.१० मार्च, २०२२ व १५ मार्च, २०२२ च्या पत्राच्या प्रती महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आल्या असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०२२०३२८१५३१५६७००७ असा आहे.

आपला,

Rasik Ambadas Khadse

Digitally signed by Rasik Ambadas Khadse
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=41d02a5c663d2c05d362d4847bea4a1874fda4e9cb60284fb102fd7b9b3891b3, cn=Rasik Ambadas Khadse
Date: 2022.03.28 17:25:36 +05'30'

**( र. अ. खडसे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**



**महाराष्ट्र शासन**

सामान्य प्रशासन विभाग,
मंत्रालय (विस्तार इमारत)
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०००३२.

दूरध्वनी क्र.(०२२) २२७९३३५५ ईमेल आयडी archana.tamore@nic.in

क्र : बीसीसी-२०२०/प्र.क्र.७२(भाग-१)/१६-ब दिनांक : १० मार्च, २०२२

प्रति,

१) मा.उप मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
२) मा.मंत्री, सार्वजनिक बांधकाम (सा.उ.वगळून), यांचे खाजगी सचिव
३) मा.मंत्री, महसूल यांचे खाजगी सचिव
४) मा.मंत्री, गृह यांचे खाजगी सचिव
५) मा. मंत्री, नगर विकास यांचे खाजगी सचिव
६) मा.मंत्री, खार जमीन व इमाव यांचे खाजगी सचिव
७) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य
८) महाधिवक्ता, महाराष्ट्र राज्य
९) अ.मु.स. (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) अ.मु.स.(अ.व सु), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
११) अ.मु.स., नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१२) अ.मु.स. सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
१३) अ.मु.स.(परिवहन), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
१४) अ.मु.स.(महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१५) अ.मु.स., इतर मागास बहुंजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई
१६) प्रधान सचिव, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
१७) प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
१८) सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई

विषय : मराठा समाजाच्या विविध मागण्या.

महोदय,

मराठा समाजाच्या विविध मागण्यांबाबत मा. मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली दि. २४ फेब्रुवारी, २०२२ रोजी बैठक संपन्न झाली. सदर बैठकीचे इतिवृत्त माहितीसाठी व उचित कार्यवाहीसाठी सोबत जोडले आहे.

आपली,

(अर्चना तामोरे)
कक्ष अधिकारी,महाराष्ट्र शासन

C:\pooja\Meeting\मंत्रिमंडळ उप समिती.docx

प्रत माहितीकरीता :

१) मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव
२) सचिव (साविस) यांचे खाजगी सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
३) सह सचिव (१६-ब), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई

बैठकीचे इतिवृत्त

मराठा समाजाच्या विविध मांगण्यासंदर्भात् मा. मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली दि. २४/०२/२०२२ रोजी बैठक आयोजित करण्यात आली होती.सदर बैठकीस खालील मा.मंत्री व अधिकारी उपस्थित होते-

१.मा.ना,श्री.अजित पवार,उप मुख्यमंत्री

२. मा.ना.श्री.अशोक चव्हाण,मंत्री,सार्वजनिक बांधकाम(सार्वजनिक उपक्रम वगळून)

३.मा.ना.श्री.दिलीप वळसे पाटील,मंत्री,गृह

४.मा.ना.श्री.बाळासाहेब थोरात,मंत्री,महसूल

५. मा.ना.श्री.अमित देशमुख, मंत्री,वैद्यकिय शिक्षण

६.ॲड.श्री.आशुतोष कुंभकोणी,महाधिवक्ता,महाराष्ट्र राज्य

७.श्री.सिताराम कुंटे,मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सल्लागार

८.श्री.देवाशिष चक्रवर्ती,मुख्य सचिव

९.ॲड.श्री.अक्षय शिंदे

१०.श्री.मनुकुमार श्रीवास्तव,अपर मुख्य सचिव,गृह विभाग

११. श्रीम.सुजाता सौनिक, अपर मुख्य सचिव (सेवा),सामान्य प्रशासन विभाग

१२.श्री.मनोज सौनिक, अपर मुख्य सचिव ,वित्त विभाग

१३. श्री.आशिष कुमार सिंग,अपर मुख्य सचिव (मुख्यमंत्री कार्यालय)

१४. श्री.नितिन करीर,महसूल विभाग

१५.श्री.नंदकुमार,अपर मुख्य सचिव,इमाबक विभाग

१६. श्री.विकास खारगे, प्रधान सचिव (मुख्यमंत्री कार्यालय)

१७.श्री.विकासचंद्र रस्तोगी,प्रधान सचिव,उच्च व तंत्र शिक्षण विभाग

१८.श्री.सौरभ विजय,सचिव,वैद्यकिय शिक्षण विभाग

१९.श्री.निरज धोटे,प्रधान सचिव,विधि व न्याय विभाग

२०.श्री.सुमंत भांगे,सचिव (साविस),सामान्य प्रशासन विभाग

२१.श्री.अशोक काकडे,व्यवस्थापकीय संचालक,सारथी

२२.श्री.शेखर चन्ने,आयुक्त,म.रा.मार्ग परिवहन महामंडळ

२३.श्री.नामदेव भोसले, व्यवस्थापकीय संचालक,अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळ

## बैठकीतील महत्वाचे निर्णय

| अ. क्र. | निर्णय | संबंधित विभाग | कालमर्यादा |
|---|---|---|---|
| १. | मराठा समाजाच्या मागण्यांसाठी सह सचिव दर्जाचा अधिकारी समन्वय व अंमलबजावणीसाठी नियुक्त करावा. | सामान्य प्रशासन विभाग(सेवा) | दोन दिवस |
| २. | मा.सर्वोच्च न्यायालयातील प्रलंबित पुनर्विलोकन याचिका निकाल निघण्याची वाट न पाहता मराठा समाजाच्या सामाजिक व शैक्षणिक मागासलेपणाचा अभ्यास करण्यासाठी स्वतंत्र व समर्पित मागासवर्ग आयोग गठित करावा. | इतर मागास बहुजन कल्याण विभाग | तात्काळ |
| ३. | मराठा समाजाच्या समर्पित मागासवर्ग आयोगासाठी अध्यक्ष व सदस्यांची नियुक्ती करावी | विधी व न्याय विभाग/ इमाबक (महाधिवक्ता यांच्या मार्गदर्शनाने ) | दोन दिवस |
| ४. | निरगुडे आयोग केवळ ओबीसी प्रकरणे हाताळेल अशी सुधारणा करावी. | इतर मागास बहुजन कल्याण विभाग | तात्काळ |
| ५. | मराठा समाजाच्या आरक्षणासाठी स्थापित मंत्रीमंडळ उपसमितीने | १.इतर मागास बहुजन कल्याण विभाग | तात्काळ |

| | | | |
|---|---|---|---|
| | केवळ न्यायिक व कायदेशीर बाबीच हाताळाव्यात व मराठा समाजाच्या अन्य मागण्या ज्या विभागाशी संबंधित आहेत त्या विभागाचे मा. मंत्री व सचिव यांनी त्यांच्याशी संबंधित मागण्यांबाबत निर्णय घ्यावा. एसईबीसी वर्गातील घटकांना विविध सवलती देणा-या दि.९.१०.२०२० च्या शासन निर्णयाची प्रभावी अंमलबजावणी संबंधित विभागांनी करावी. | २.नियोजन विभाग<br>३.उच्च व तंत्र शिक्षण विभाग<br>४.गृह विभाग<br>५.परिवहन विभाग<br>६.वैद्यकिय शिक्षण विभाग<br>७.महसूल विभाग<br>८.सार्वजिनक बांधकाम विभाग<br>९.सामान्य प्रशासन विभाग(सेवा/सीटीपीटी/साविस) | |
| ६. | ज्या महामंडळांवर व्यवस्थापकीय संचालकांची पदे रिक्त आहेत ती आवश्यकतेनुसार भरावीत. | नियोजन विभाग | तात्काळ |
| ७. | सारथीच्या विभागीय उप केंद्रांसाठी उपलब्ध करून द्यावयाच्या जमिनींच्या प्रलंबित प्रस्तावांवर निर्णय घ्यावा. कोल्हापूर उप केंद्रास प्राधान्य द्यावे | महसूल विभाग | तात्काळ |
| ८. | मराठा आंदोलनकर्त्यांच्या वारसांना नोकरीची प्रलंबित प्रकरणे तात्काळ निकाली काढावी. | परिवहन विभाग | तात्काळ |
| ८. | मराठा समाजाच्या मागण्यांसंदर्भात राज्य शासनाच्या वेबसाईटवर शासनाच्या निर्णयांची माहिती अपलोड करुन ती वेळोवेळी अद्यावत करणे | सामान्य प्रशासन विभाग | तात्काळ |
| ९. | सारथीकडील विभागीय उप केंद्रांची २७३ पद भरती | सामान्य प्रशासन विभाग(सेवा) व नियोजन विभाग | १ महिना |
| १०. | राज्यातील विनावापर बांधून तयार असलेल्या शासकीय इमारतींचा वसतीगृहांसाठी प्राधान्याने वापर करावा. | महसूल आणि उच्च व तंत्रशिक्षण विभाग | तात्काळ |

| | | | |
|---|---|---|---|
| ११. | मराठा आंदोलनकर्त्यांवरील न्यायालयातील ११४ प्रलंबित खटले तात्काळ निकाली काढण्यासाठी न्यायालयाकडे पाठपुरावा करावा. | गृह विभाग व विधी व न्याय विभागाने महाधिवक्त्यांच्या मार्गदर्शनाखाली | तात्काळ |
| १२. | अधिसंख्य पदे निर्माण करणे- मा.सर्वोच्च न्यायालयाच्या दि.५.५.२०२१ च्या निर्णयान्वये एसईबीसी आरक्षण रद्द करण्यात आल्यानंतर एसईबीसी प्रवर्गातील जे उमेदवार निवडप्रक्रियेतून बाद झाले त्यांना नियुक्ती देण्याकरीता अधिसंख्य पदे निर्माण करता येणार नाहीत, त्यामुळे शासनाने हे प्रकरण बंद करावे असे कायदेशिर अभिप्राय ज्येष्ठ विधिज्ञ ॲड.श्री.परमजितसिंग पटवालिया यांनी दिले असल्याचे महाधिवक्ता,म.रा.यांनी सांगितले.त्यामुळे अधिसंख्य पदे निर्माण करण्याचा विषय शासन स्तरावरुन निकाली काढण्यात यावा. | सामान्य प्रशासन विभाग(साविस) | |
| १३. | सारथी व अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळ यांना आवश्यतेनुसार निधी उपलब्ध करुन देण्यात यावा. | नियोजन व वित्त विभाग | तात्काळ |
| १४. | सारथी मधील भ्रष्टाचाराची चौकशी करणा-या निंबाळकर समितीच्या अहवालावर तात्काळ निर्णय घेण्यात यावा. | नियोजन विभाग | तात्काळ |



**महाराष्ट्र शासन**

सामान्य प्रशासन विभाग,

मंत्रालय (विस्तार इमारत)

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०००३२.

दूरध्वनी क्र.(०२२) २२७९३३५५ ईमेल आयडी archana.tamore@nic.in

क्र : बीसीसी-२०२०/प्र.क्र.७२(भाग-३) ए/१६-ब दिनांक : १५ मार्च, २०२२

प्रति,

१) मा.उप मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
२) मा.मंत्री, गृह यांचे खाजगी सचिव
३) मा. मंत्री, वैद्यकीय शिक्षण यांचे खाजगी सचिव
४) श्री.सिताराम कुंटे, मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सल्लागार
५) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य
६) महाधिवक्ता, महाराष्ट्र राज्य
७) अ.मु.स. (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
८) अ.मु.स.(अ.व सु), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
९) अ.मु.स., नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) अ.मु.स.(परिवहन), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
११) अ.मु.स.(महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१२) अ.मु.स., इतर मागास बहुंजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई
१३) प्रधान सचिव, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
१४) प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
१५) सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई
१६) व्यवस्थापकीय संचालक, सारथी
१७) आयुक्त, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ
१८) व्यवस्थापकीय संचालक, अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळ

विषय : मराठा समाजाच्या विविध मागण्या.

महोदय,

मराठा समाजाच्या विविध मागण्यांबाबत मा. मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली दि. २८ फेब्रुवारी, २०२२ रोजी बैठक संपन्न झाली. सदर बैठकीचे इतिवृत्त माहितीसाठी व उचित कार्यवाहीसाठी सोबत जोडले आहे.

आपली,

अर्चना तामोरे

(अर्चना तामोरे)

कक्ष अधिकारी,महाराष्ट्र शासन

प्रत माहितीकरीता :

१) मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव
२) सचिव (साविस) यांचे खाजगी सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
३) सह सचिव (१६-ब), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई

## बैठकीचे इतिवृत्त

मराठा समाजाच्या विविध मांगण्यासंदर्भात मा. मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली दि.२८/०२/२०२२ रोजी त्यांच्या वर्षा निवास्थानी बैठक आयोजित करण्यात आली होती.सदर बैठकीस खालील मा.मंत्री व अधिकारी उपस्थित होते-

१.मा.ना. श्री. अजित पवार, उप मुख्यमंत्री

२. मा.ना.श्री.दिलीप वळसे पाटील, मंत्री, गृह

३. मा.ना. श्री.अमित देशमुख, मंत्री, वैद्यकिय शिक्षण

४. श्री.सिताराम कुंटे, मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सल्लागार

५. श्री.देवाशिष चक्रवर्ती, मुख्य सचिव

६. श्री.मनुकुमार श्रीवास्तव, अपर मुख्य सचिव, गृह विभाग

७. श्रीम.सुजाता सौनिक, अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग

८. श्री.मनोज सौनिक, अपर मुख्य सचिव, वित्त विभाग

९. श्री.आशिष कुमार सिंग, अपर मुख्य सचिव (मुख्यमंत्री कार्यालय)

१०. श्री.नितिन करीर, महसूल विभाग

११. श्री.नंदकुमार, अपर मुख्य सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग

१२. श्री.विकासचंद्र रस्तोगी, प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग

१३. श्री.सौरभ विजय, सचिव, वैद्यकिय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग

१४. श्री.सुमंत भांगे,सचिव (साविस), सामान्य प्रशासन विभाग

१५. श्री.अशोक काकडे,व्यवस्थापकीय संचालक, सारथी

१६. श्री.शेखर चन्ने,आयुक्त,म.रा.मार्ग परिवहन महामंडळ

१७. श्री.नामदेव भोसले, व्यवस्थापकीय संचालक, अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळ

## बैठकीतील महत्वाचे निर्णय

| अ.क्र | निर्णय | संबंधित विभाग |
|---|---|---|
| १. | सारथीकडून कौशल्य विकासाचे कार्यक्रम एका महिन्यात सुरु करण्यात येतील. | नियोजन |
| २. | सारथी Vision Document तज्ञांचा सल्ला घेऊन ३०/६/२०२२ पर्यंत तयार करण्यात येईल. | नियोजन |
| ३. | सारथीमधील रिक्त पदे दि. १५ मार्च, २०२२ पर्यंत भरण्याबाबत निर्णय घेण्यात आला आहे. | नियोजन |
| ४. | सारथी संस्थेच्या आठ उपकेंद्रांसाठी जमिन देण्याचा प्रस्ताव दि. १५ मार्च, २०२२ पर्यंत मंत्रीमंडळास सादर करुन मान्यता घेण्यात येईल. | महसूल |
| ५. | अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळाला चालू आर्थिक वर्षात मंजूर रु. १०० कोटी पैकी रु. ८० कोटी प्राप्त झाले आहेत. उर्वरीत रु. २० कोटी उपलब्ध करुन देण्याबरोबरच पुरवणी मागणीव्दारे अतिरिक्त १०० कोटी रुपये निधी उपलब्ध करुन देण्यात येईल. | नियोजन |
| ६. | व्याज परतावासंदर्भात कागपत्रांची पूर्तता करुन प्रस्ताव प्राप्त झाल्यास, व्याज परतावा तातडीने देण्यात येईल. CREDIT GURANTEE बाबत धोरणात्मक निर्णय घेण्यात येईल | नियोजन |
| ७. | परदेशी शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक कर्जावरील व्याज परताव्या बाबत धोरण तयार करण्यात येत आहे | नियोजन |
| ८. | व्याज परताव्यासाठी कर्जाची मुदत रु.१० लाखावरून रु.१५ लाख करण्यात येईल. | नियोजन |
| ९. | अण्णासाहेब पाटील आर्थिक विकास महामंडळ व इतर दोन महामंडळांवर पूर्णवेळ व्यवस्थापकीय संचालक दि. १५ मार्च २०२२ पर्यंत नियुक्त करण्यात येतील. तसेच संचालक मंडळाची नियुक्ती करण्यात येईल. आवश्यकतेनुसार इतर कर्मचारी नियुक्त करण्यात येतील. | नियोजन |
| १०. | जिल्ह्यात स्थापन करावयाच्या वसतिगृहांची यादी उच्च व तंत्रशिक्षण विभागाकडून आजच उपलब्ध करून देऊन तयार असलेल्या वस्तीगृहांचे उद्घाटन येत्या गुढी पाडव्याच्या दिवशी करण्यात येईल. | उच्च व तंत्र शिक्षण |

| | | |
|---|---|---|
| ११. | कोपर्डी खून खटला प्रकरणी माननीय उच्च न्यायालयात दाखल अपिलाची सुनावणी तातडीने घेण्याबाबत महाधिवक्ता यांना विनंती करून दि. २ मार्च, २०२२ रोजी प्रकरण मेंन्शन करण्यात येईल | गृह |
| १२. | रिव्ह्यू पिटीशन ची सुनावणी खुल्या न्यायालयात घेण्याबाबत माननीय सर्वोच्च न्यायालयात पंधरा दिवसात अर्ज करण्यात येईल त्याबाबतचे प्रकरण माननीय मंत्री, सार्वजनिक बांधकाम, मा. मंत्री, गृह व मा. मंत्री, नगर विकास हे हाताळतील. | सामान्य प्रशासन विभाग, (सा.वि.स.), महाधिवक्ता व मा. सर्वोच्च न्यायालयातील सरकारी वकील |
| १३. | मराठा आंदोलकांवरील दाखल गुन्हे मागे घेण्याबाबतच्या कार्यवाहीबाबत प्रत्येक महिन्यात गृह विभागाकडून आढावा बैठक घेण्यात येईल. तसेच जे गुन्हे मागे घेतलेले आहेत परंतु न्यायालयीन पटलावर प्रलंबित आहेत त्याचा आढावा घेवून प्रकरण निहाय पाठपुरावा करण्यात येईल. | गृह |
| १४. | मराठा आरक्षण प्रकरणी मा. सर्वोच्च न्यायालयाच्या दिनांक ०९/०९/२०२० च्या स्थगिती आदेशापूर्वी नियुक्तीकरिता शिफारस झालेल्या परंतु दिनांक ०९/०९/२०२० नंतर सुधारीत निवड यादीनुसार जे एसईबीसी, ईएसबीसी व इडब्ल्युएस उमेदवार शासकीय सेवेतून बाहेर पडतील त्यांच्यासाठी मानवतावादी दृष्टीकोनातून अधिसंख्य पदे निर्माण करुन त्यांच्या नियुक्तीबाबतचा प्रस्ताव एक महिन्यात मंत्रीमंडळापुढे सादर करावा. | सामान्य प्रशासन विभाग, (सा.वि.स.) |
| १५. | मराठा आंदोलनात मृत पावलेल्यांच्या वारसदारांना एस. टी. महामंडळात नोकरी देण्याच्या उर्वरीत प्रस्तावावर तात्काळ निर्णय घ्यावा व त्यासाठी संबंधित उमेदवारांकडून कागदपत्रांची पूर्तता करुन घ्यावी. | परिवहन |

************